**सिंगल विंडो इंटरफेस अंतर्गत टप्पानिहाय कार्यवाही करणे**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१५/२-अे
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ एप्रिल, २०२५.

**वाचा :** १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.३१ जानेवारी, २०२५.
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.२८ फेब्रुवारी, २०२५.
३. कृषि विभाग पत्र क्र. बैठक २०२५/प्र.क्र.८५/११अे (ई-१०४३४८१) दि. २६ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

कृषि विभागाच्या दि. ३१ जानेवारी, २०२५ रोजीच्या शासन निर्णयानुसार कृषि विभागामार्फत शेतकऱ्यांना सल्ला सेवा देण्याच्या उद्देशाने डिजिटल तंत्रज्ञानावर आधारित “कृषि माहितीसाठी एकच खिडकी” म्हणजेच Single Window Interface - SWI तसेच “शेतकऱ्यांसाठी एकच मोबाईल ॲप” तयार करण्याच्या उद्देशाने प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत केली होती. सदर समितीने या संदर्भातील अहवाल सादर केला आहे. सदर अहवाल स्वीकृत करण्यात आला व संदर्भाधीन दि. २८ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये डिजिटल तंत्रज्ञानाच्या आधारे शेतकऱ्यांना उत्तम शेती करण्यासाठी आवश्यक असलेल्या विविध प्रकारच्या गरजा भागविण्यासाठी “शेतकऱ्यांसाठी एकच मोबाईल ॲप” शक्य तितक्या लवकर विकसित करण्यासाठी जलद कृती गटांची स्थापना करण्यात आली आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. २० मार्च, २०२५ रोजी झालेल्या बैठकीदरम्यान दिलेल्या निर्देशानुसार तीन विविध टप्प्यांत सिंगल विंडो इंटरफेसची अंमलबजावणी करावयाची आहे. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील मोठ्या संख्येने असलेल्या अल्प व अत्यल्प भूधारक तसेच बहुभूधारक आणि बागायती शेतकऱ्यांना शेतीमधील जोखीम कमी करण्यासाठी विविध प्रकारची अद्ययावत माहिती सहज समजेल अशा स्वरुपात निरंतरपणे उपलब्ध करून देण्यासाठी आणि सध्या उपलब्ध झालेल्या डिजिटल तंत्रज्ञानामुळे शेतकऱ्यांना उत्तम शेती करण्यासाठी आवश्यक असलेल्या विविध प्रकारच्या गरजा भागविण्यासाठी “शेतकऱ्यांसाठी एकच मोबाईल ॲप” तयार करण्याकरीता विभागात काम सुरु आहे. त्यामध्ये काही सुविधा शेतकऱ्यांना तात्काळ उपलब्ध होण्याच्या दृष्टीने व ज्या सुविधा

शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविण्यास थोडा कालावधी लागणार आहे, त्याचा विचार करता, खालीलप्रमाणे अंमलबजावणीचे टप्पे ठरविण्यात येत आहेत.

| अ.क्र. | टप्पा व मुदत | करावयाची कार्यवाही |
|---|---|---|
| १. | अल्प मुदत टप्पा (खरीप २०२५ पर्यंत) | सध्या उपलब्ध असलेले हवामान अंदाज, पिकांचे व्यवस्थापन, जमीन (मृदा) व्यवस्थापन, विद्यापीठाद्वारे विकसित तंत्रज्ञान आणि अनुदान योजनांची माहिती शेतकऱ्यांना उपलब्ध करुन देणे. ह्यासाठी कृत्रिम बुध्दीमत्ता तंत्राचा वापर करणे. |
| २. | मध्यम मुदत टप्पा (खरीप २०२६ पर्यंत) | कृषि विभागाची महाडिबीटी, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाची डिबीटी व ॲग्रिस्टॅक योजना ऑनबोर्ड करणे, सुदूर संवेदन (Remote Sensing) आणि IoT (Internet of Things) आधारित सल्ला सेवा शेतकऱ्यांना उपलब्ध करुन देणे. |
| ३. | दीर्घ कालीन टप्पा (खरीप २०२७ पर्यंत) | कृत्रिम बुध्दीमत्ता तंत्राच्या आधारे पिकांवरील किडरोगांचा अंदाज, प्रत्येक शेतकऱ्यासाठी त्यांचे शेतीला उपयुक्त अद्ययावत सल्ला, वित्त विषयक आणि विमाविषयक सेवांचे एकत्रीकरण करणे. |

२. उपरोक्त टप्प्यांनुसार कालमर्यादित कार्यवाही करण्यासंदर्भात आयुक्त (कृषि) व प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांची संयुक्त जबाबदारी राहील. तसेच, सदर प्रकरणी केलेल्या कार्यवाहीबाबत प्रधान सचिव, कृषि यांना वेळोवेळी अवगत करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा २०२५०४१६१६३३०८२८०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

51b59e81-8ea7-4da3-9ce0-f3fd7635c54b

Digitally signed by 51b59e81-8ea7-4da3-9ce0-f3fd7635c54b
DN: cn=51b59e81-8ea7-4da3-9ce0-f3fd7635c54b
Date: 2025.04.16 19:23:51 +05'30'

(विकास चंद्र रस्तोगी)

प्रधान सचिव (कृषि), महाराष्ट्र शासन

प्रत

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास व गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
१४. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.
१५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
१६. प्रकल्प संचालक, बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र राज्य कृषि व्यवसाय आणि ग्रामीण परिवर्तन प्रकल्प, पुणे.
१७. महासंचालक , महाराष्ट्र कृषी शिक्षण आणि संशोधन परिषद , पुणे.
१८. कुलगुरू, महात्मा फुले कृषी विद्यापीठ/ वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ/ डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला/ डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१९. जलद कृती गटातील सर्व सदस्य, (सहसंचालक (प्रशासन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचेमार्फत)

प्रत माहितीसाठी,

१. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागातील सर्व उप सचिव यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. निवडनस्ती (२-अे)